राज्य स्तरीय आदिवासी उपयोजनेंतर्गत "पर्यटनासाठी वनांचा विकास करणे " या उपयोजनेंतर्गत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरीत करणेबाबत..
(लेखाशिर्ष क्र. २४०६ ८६५१)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१६/प्र. क्र.१६/कार्यासन.६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: - २२ मार्च, २०१७.

वाचा -

१) वि. वि,शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.०४.२०१६.
२) वि. वि, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण- २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५,दि.१०.५.२०१६
३) महसूल व वन विभाग, नस्ती क्रमांक निसप - २०१७/ प्र.क्र. ४७ / फ-५.

**शासन निर्णय-**

आदिवासी उपयोजनांतर्गत मागणी क्र.टी-५, २४०६-वनीकरण व वन्यजीवन, पंचवार्षिक योजनेअंतर्गत योजना, ०१-वनीकरण, ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनेअंतर्गत योजना -राज्य योजनांतर्गत योजना, (०१), (०९) पर्यटनासाठी वनांचा विकास करणे, (२४०६ ८६५१) ०२- मजूरी या लेखाशीर्षाखाली सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात रु. १८८.०० लक्ष निधी अर्थसंकल्पित आहे.

वाचा क्र. ३ येथील प्रस्तावास अनुलक्षून सन २०१६-१७ करिता राज्य स्तरीय आदिवासी उपयोजनेंतर्गत (०१), (०९) पर्यटनासाठी वनांचा विकास करणे, (२४०६ ८६५१), ०२- मजुरी या लेखाशिर्षाखालील मंजूर व अर्थसंकल्पित निधीच्या ८० % मर्यादेत एकुण रु.१६२.९९ लाख (अक्षरी रुपये एक कोटी बासष्ट लाख नव्याण्णव हजार फक्त) इतका निधी या योजनेचे नियंत्रक अधिकारी सचिव (वने), महसूल व वन विभाग यांना खर्चासाठी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरित करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. नियंत्रण अधिकारी आणि विभागप्रमुख यांनी ही तरतुद शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५ दिनांक ९.३.१९९० अन्वये निश्चित केलेल्या आदिवासी उपयोजना क्षेत्र व क्षेत्राबाहेरील मान्य योजनांवर खर्च होतील याची दक्षता घ्यावी. तसेच या तरतूदी खर्च करतांना शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.टिएसपी-२००३/प्र.क्र.१०१/का-६, दिनांक २६ जुलै, २००४ व टिएसपी-२००५/प्र.क्र.५९/का-६, दिनांक १० नोव्हेंबर, २००५ मधील अटींचे कटाक्षाने पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी. तसेच प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या तरतूदी मासिक खर्च विवरणपत्राप्रमाणे खर्च करण्याची दक्षता नियंत्रक अधिका-यांनी घ्यावी.

३. आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लोकांकरिता वा आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी क्षेत्राबाहेरील क्षेत्रासाठी केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी लोकांकरिता खर्च करण्यात यावी. आदिवासी उपयोजनेंतर्गत केलेली तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेर किंवा सर्वसाधारण योजनेखाली खर्च करण्यात येवू नये.

४. तसेच आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल लेखाशिर्षनिहाय/उप लेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास, महसूल व वन विभाग व आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत न चुकता पाठवावी.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल व तो केंद्रशासनाला कळविता येईल.

६. सदर शासनादेश **वाचा** येथील क्रमांक १ मधील वित्त विभागाच्या शासन परिपत्रक शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३,दि.२०.०४.२०१६ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३२२१३०५२७४७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Bhagwan Maruti Sawant

Digitally signed by Bhagwan Maruti Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Maruti Sawant
Date: 2017.03.22 13:14:08 +05'30'

**भगवान सावंत**
अवर सचिव.

**प्रत,**

१. सचिव, (वने) महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
५. महालेखापाल (लेखापरिक्षा) /(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
६. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९. महसूल व वन विभाग (फ-२), मंत्रालय, मुंबई
१०. अवर सचिव, कार्या-१४, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.